**शाळा आणि शासकीय वसतीगृहांतील विद्यार्थ्यांकरिता कार्यरत थेट लाभ हस्तांतरण (डीबीटी) धोरणाचा अभ्यास करण्यासाठी अभ्यासगट स्थापन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन शुद्धीपत्रक, क्र.आवगृ-२०१८/प्र.क्र.१२/का-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दि. २४ ऑगस्ट, २०२०.

वाचा :-

१. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.आवगृ-२०१८/प्र.क्र.१२/का-१२, दि.१३.०८.२०२०.

**शासन शुद्धीपत्रक :-**

शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थी वैयक्तिक वापराच्या वस्तू व लेखन साहित्य, पुस्तके इत्यादी बाबीसाठी तसेच जिल्हा, विभाग व महानगरपालिका स्तरावरील वसतीगृहामधील विद्यार्थ्यांना भोजनासाठी देण्यात येणाऱ्या DBT धोरणाचा अभ्यास करून पूर्वीप्रमाणे सदर साहित्य वस्तू स्वरुपात द्यावे/आहारासाठी भोजनठेके सुरू करावेत किंवा DBT धोरणच सुरु ठेवावे, याचा अभ्यास करणेसाठी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये अभ्यासगट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सदर शासन निर्णयातील,

**मानधन व प्रवास भत्ता:-**

शासकीय सेवेतून निवृत्त झालेल्या सदस्या व्यतिरिक्त अन्य सदस्य व अशासकीय सदस्य यांना समितीच्या कालावधीसाठी उपस्थिती भत्ता प्रति बैठक रु. ५०००/- व सर्व सदस्यांना प्रत्यक्ष केलेल्या प्रवासानुसार रेल्वेच्या वर्ग-२ च्या तिकिटाच्या दराने प्रवासभाडे देय राहील. अभ्यासगटाच्या बैठकी संदर्भात सर्व व्यवस्था क्षेत्रिय कार्यालयांनी करावी.

**याऐवजी,**

**मानधन व प्रवास भत्ता:-**

शासकीय सेवेतून निवृत्त झालेल्या सदस्या व्यतिरिक्त अन्य सदस्य व अशासकीय सदस्य यांना समितीच्या कालावधीसाठी उपस्थिती भत्ता प्रति बैठक रु. ५०००/- व सर्व सदस्यांना प्रत्यक्ष केलेल्या प्रवासानुसार रेल्वेच्या **2 Tier AC** च्या तिकिटाच्या दराने प्रवासभाडे देय राहील. अभ्यासगटाच्या बैठकी संदर्भात सर्व व्यवस्था क्षेत्रिय कार्यालयांनी करावी, असे वाचावे.

**त्याचप्रमाणे,**

**अभ्यासगटावर होणारा खर्च :-**

सदर अभ्यासगटाकरिता होणारा खर्च २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण; ०२, अनुसूचित जमातीचे कल्याण; ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना; (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना; (०१)(५९), मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतीगृह (राज्यस्तर योजना) (कार्यक्रम); २२२५ D७२५ या लेखाशीर्षाखालील ५०-इतर खर्च या बाबीखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून करण्यात यावा.

**याऐवजी,**

**अभ्यासगटावर होणारा खर्च :-**

सदर अभ्यासगटाकरिता होणारा खर्च २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण; ०२, अनुसूचित जमातीचे कल्याण; ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना; (०२)(०१) नियोजन व संनियंत्रण शाखा-जनजाती विकास संशोधन व प्रशिक्षण संस्था (राज्य हिस्सा)(कार्यक्रम); **२२२५ २६५८ (३१ सहाय्यक अनुदाने)** या बाबीखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून करण्यात यावा, असे वाचावे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००८२५१४४९५४५२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAVIT BHAURAO RAGHUNATH

Digitally signed by GAVIT BHAURAO RAGHUNATH
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb82745 7be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489c a14b4e0f644bf05a04e89c, cn=GAVIT BHAURAO RAGHUNATH
Date: 2020.08.25 15:00:37 +05'30'

**(भा.रा.गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व मा. विधानसभा सदस्य.
६) सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) अभ्यासगटातील सर्व माननीय सदस्य **(आयुक्त ,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था ,पुणे यांच्यामार्फत)**
१०) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

११) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक.
१३) अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१४) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१५) महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१६) महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवडनस्ती (का-१२) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.